**महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून (MahaIT) कस्टमाईज्ड एचटीई सेवार्थ प्रणालीसाठी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. सेवार्थ-२२२३/प्र.क्र.७६/मशि-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ एप्रिल, २०२३

<u>वाचा:</u>

१. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.२७/कोषा प्रशा-४ दि. ३.११.२०१८
२. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.११०/२०१८/आस्था-२, दिनांक २५.१.२०१९
३. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.११०/२०१८/आस्था-२ दिनांक १८.१.२०२०
४. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.११०/२०१८/आस्था-२ दिनांक ११.१.२०२१
५. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.११०/२०१८/आस्था-२ दिनांक ३०.३.२०२१
६. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.सेवार्थ २२२१/प्र.क्र.१४६/२०२१/मशि-२ दिनांक १.४.२०२२
७. महाआयटीचे पत्र क्र. MH-IT/OW/०३२३/००६, दिनांक १३.३.२०२३

**<u>प्रस्तावना:</u>**

"एचटीई सेवार्थ प्रणाली ही, उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीत येणाऱ्या अनुदानित महाविद्यालयातील तसेच अकृषी विद्यापीठातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीताची कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणाली आहे. या प्रणालीमध्ये उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे ६९००० (८७%) कर्मचारी व कौशल्य विकास व उद्योजकता विभागाचे ९५३५(१३%) कर्मचारी समाविष्ठ आहेत.

वित्त विभागाच्या निर्देशानुसार एचटीई सेवार्थ प्रणालीचे विकसन आणि देखभाल करण्याची जबाबदारी महाआयटी यांचेकडे देण्यात आलेली आहे. या प्रणालीच्या विकसन आणि देखभालीचे काम उपरोक्त क्र.२ च्या शासन निर्णयान्वये महाआयटी यांचेकडे दिनांक १.१.२०१९ ते ३१.१२.२०१९ या कालावधीकरिता देण्यात आले होते. त्यानंतर त्यास वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ६ अन्वये हा कालावधी दि. ३१.३.२०२३ पर्यंत वाढवून देण्यात आलेला आहे.

उपरोक्त आदेश कालावधी ३१.३.२०२३ रोजी संपुष्टात आला आहे. एचटीई सेवार्थ प्रणालीचे विकसन व देखभालीचे काम यापुढे नियमित सुरु राहणेसाठी आगामी कालावधीकरीता देखील महाआयटी यांना नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

"एचटीई सेवार्थ" प्रणालीचे विकसन आणि देखभाल करण्याकरीता सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित (महाआयटी) कडून उच्च व तंत्र शिक्षण विभागाकरिता स्वतंत्र, १ सिनिअर सॉफ्टवेअर डेव्हलपर व ७ विभागांमध्ये विभागून दरपत्रकाच्या २०% मोबदल्यात १ सिनिअर टेक्निकल मॅनेजर, १ बिझनेस ॲनॅलिस्ट, १ नेटवर्क स्पेशालीस्ट, १ डेटाबेस ॲडमीनीस्ट्रेटर, १ सोफ्टवेअर टेस्टर व १ आयटी ऑफिस असिस्टंट इतके मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर आदेश हे ०१ एप्रिल, २०२३ ते ३१ मे, २०२३ या दोन महिन्याच्या कालावधीसाठी लागू असतील. दरम्यान मे, महिन्याच्या शेवटच्या आठवडयात महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) यांच्याकडून मागील वर्षी केलेल्या कामाचा तपशील व पुढील वर्षाच्या कामाच्या नियोजनाबाबत प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्याकडे सादरीकरण करण्यात यावे. त्यानंतर पुढील मुदतवाढीबाबत निर्णय घेण्यात येईल.

३. सदर बाबीवर होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यु-६, २२५१-सचिवालयीन-सामाजिक सेवा ९०-सचिवालय ०८-उच्च व तंत्रशिक्षण विभाग (०८) (०२) उच्च शिक्षणासाठी ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) (२२५१ १०११) १७-संगणक खर्च" या लेखाशीर्षाखाली, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२५१७४९४५६९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT S PATHAK

Digitally signed by HEMANT S PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EE03447853A43CF2A3547CBC186E49802A70EF183CF488073E81785E6AD171A6, cn=HEMANT S PATHAK
Date: 2023.04.25 17:57:10 +05'30'

**( हे. सु. पाठक )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उदयोजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मंत्रालय, मुंबई
७. सर्व सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण, विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय सह संचालक / क्षेत्रीय अधिकारी, उच्च / तंत्र / कला शिक्षण संचालनालय.
९. कक्ष अधिकारी (रोखशाखा), आहरण व संवितरण अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कक्ष अधिकारी (कोषा प्रशा-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. संचालक, कला संचालनालय, मुंबई
१२. संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१३. महालेखापाल ½ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. महालेखापाल ½ लेखा व परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७. अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवडनस्ती, मशि-२.